राज्यातील बँकींग परवाना नसलेल्या नागपूर, वर्धा, व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांचा CRAR किमान ४% होण्यासाठी शासकीय भागभांडवलाचे स्वरूपात अर्थसहाय्य उपलब्ध करण्यास मंजूरी देणेबाबत.....

महाराष्ट्र शासन

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन शुध्दीपत्रक क्रमांक :- बैठक ०६१३/प्र.क्र.३७५/२-स

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक : ३/९/२०१४

वाचा :- शासन निर्णय क्रमांक बैठक ०६१३/प्र.क्र.३७५/२-स दि. १९.६.२०१४

शासन शुध्दीपत्रक :-

नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., या तीन जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांची भांडवल पर्याप्तता (CRAR) किमान ४% होऊन त्यांना भारतीय रिझर्व बँकेकडून बँकींग परवाना मिळण्याचे निकष पूर्ण करून पात्र होण्यासाठी त्यांना कमी पडणारी रक्कम उपलब्ध व्हावी यासाठी शासकीय भागभांडवलाचे स्वरूपात अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यास वाचा मधील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तथापी उपरोक्त शासन निर्णयातील अट क्र. २ मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. वरील शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे दुरुस्ती करण्यात यावी.

शासन निर्णयातील अट क्र (२)

२) नागपूर व वर्धा जि.म.स. बँकेच्या आपसातल्या रोखे व्यवहाराच्या न्यायालयीन वादा संदर्भात तडजोड करुन सध्या यासाठी न्यायालयीन आदेशाप्रमाणे जमा केलेली रक्कम ज्या बँकेस दिली जाईल ती रक्कम वजा जाता उर्वरित रक्कम संबंधित बँकेस वितरित करण्यात येईल.

या ऐवजी

२) रोखे खरेदी व्यवहाराशी संबंधित नागपूर जि.म.स. बँकेची दि. ३१/३/२०१४ अखेर महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेत मुदत ठेव म्हणून जमा असलेली रक्कम रु. ५३.०७ कोटी व त्यावरील व्याज मा. न्यायालयाचा निर्णय ज्या बँकेच्या बाजूने होईल त्या बँकेकडून शासनास जमा करण्यात यावी. सदरची रक्कम या बँकेकडून शासनास देय असलेल्या रकमेपोटी समायोजित करण्यात यावी.

असे वाचण्यात यावे.

सदर शासन शुध्दीपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्र. २०१४०९०४१३४९३९९५०२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डीजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2014.09.04 13:45:39 +05'30'

( संतोष पाटील )
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री
२) मा.उपमुख्यमंत्री.
३) सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री.
४) मा. मुख्य सचिव.
५) मा. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग.
६) मा. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग.
७) प्रधान महालेखाकार, (लेखापरीक्षा-१ / २), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
८) प्रधान महालेखाकार Vaucher Level Computer Section ( V L C ), मुंबई.
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०) सहकार आयुक्त व निबंधक , सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन/ले.प), नागपूर व अमरावती विभाग
१२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
१३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलढाणा.
१४) जिल्हा विशेष लेखापरीक्षण वर्ग-१, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलढाणा.
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलढाणा जि. म. स. बँक, मर्या.

१६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलढाणा.

१८) वित्त विभाग ( व्यय-२ व अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई.

१९) नियोजन विभाग ( का.१४३१ ) , मंत्रालय, मुंबई

२०) कक्ष अधिकारी ,१७- स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

२१) निवड नस्ती,२- स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.